नक्षलवाद्याच्या हल्ल्यात बळी पडणा-या
व्यक्तींच्या वारसांस तसेच जखमींना
मदत मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग (विशेष)

शासन निर्णय क्र.एनएएक्स २००२/प्र.क्र.१८१/भाग-३/विशा-१ब
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक: २५ फेब्रुवारी, २००४.

<u>वाचा</u>:-पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/३५/२८०१/
एसीएम-६४-०३, दि.३.५.२००३.

<u>निर्णय</u>:- नक्षलवाद्यांच्या हल्ल्यात बळी पडलेल्या व्यक्तींच्या नातेवाईकांस तसेच जखमी व्यक्तींन एक विशेष बाब म्हणून यापूर्वी मुख्यमंत्री सहायता निधीतून मदत दिली जात होती. केंद्र शासनाच्या योजनेअंतर्गत अशा प्रकारे दिलेल्या मदतीचा ५० टक्के परतावा मिळतो. या प्रयोजनासाठी या पूर्वी अर्थसंकल्पात तरतूद करण्यात येत नव्हती. परंतु यापुढे नक्षलवादी हल्ल्यात जखमी झालेल्या व्यक्तींना व मृतांच्या वारसांना खालील प्रमाणे अर्थसहाय्य देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे:-

१) मृत्यु प्रसंगी भरपाई - रु. १,००,०००/-
२) गंभीर जखमी - रु. ७५,०००/-
३) किरकोळ जखमी - रु. २५,०००/-

२. या खर्चापैकी ५० टक्के केंद्र शासनाकडून भरपाई मिळणार असल्याने खर्ची पडलेल्या रकमेचा तपशील महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई याच्यातर्फे शासनास एकत्रितरित्या सादर करण्यात यावा. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदर खर्च करण्याकरीता संबधित जिल्हयाच्या पोलीस अधिक्षकांना प्राधिकृत करण्याची कार्यवाही करावी.

३. हा खर्च "२०५५-पोलीस, १०९-जिल्हा पोलीस- (००)(०१)-जिल्हा पोलीस दल (२०५५०१९६८), ४१- सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली सन २००३ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर करण्यात आलेल्या पुरवणी मागणीतून भागविण्यात यावा.

४. हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक सीआर-९१/०४/व्यय-७, दिनांक ८.२.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वा. म. तुरुकमाने )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग (विशेष).

प्रत,

१) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई. (१० प्रती)
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई, नागपूर.
३) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) वित्त विभाग/व्यय-७, मंत्रालय, मुंबई.
५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) गृह विभाग, (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती.

*********